दोन किंवा अधिक पदांवर नियुक्त्यांच्या
कालावधीतील अतिरिक्त वेतन/विशेष वेतन

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : वेतन १४९१/प्र.क्र.१२८/९१/सेवा-३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक २९ मार्च, १९९४.

**वाचा :**-१) शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक : वेतन-१२७५/२५३८/एस-१, दिनांक १ ऑगस्ट, १९७५,
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक वेतन-१२७७/प्र.क्र.९९२/सेवा-३, दिनांक १६ नोव्हें.,१९७८
३) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक : डीबीबी-१०८८/प्र.क्र.१३८८/अर्थसंकल्प-१९,दिनाक १५ फेब्रुवारी,१९७९,
४) शासन निर्णय,वित्त विभाग,वेतन-१२८३/सीआर-१७९/सेवा-७, दिनांक २ जानेवारी,१९८५,
५) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र. वेतन १३९०/प्र.क्र.२/९०/सेवा-८,दिनांक १० मे,१९९०.

**प्रस्ताना** :- महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम,१९८१ च्या नियम ५६ अन्व्ये पद रिक्त झाल्यापासून सहा महिन्यापर्यंन्त विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख यांना व एक वर्षापर्यन्त प्रशासकीय विभाग यांना अतिरिक्त वेतन/विशेष वेतन मंजूर करण्याचे अधिकार आहेत. एक वर्षावर अतिरिक्त कार्यभार चालू ठेवावयाचा असल्यास वरील आदेशानुसार सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभाग यांची पूर्वानुमती घेणे आवश्यक होते. तथापि, ही कार्यपध्दती अनुसरली जात नाही असे शासनाचे निदर्शनास आले आहे.

**नि र्ण य**

२. शासनाने या बाबीचा सखोलपणे अभ्यास करुन पुढील निर्णय घेतला आहे.

**एक)** शासन निर्णय क्रमांक पीएवाय १२८३/सीआर-१९१/सेवा-७, दिनांक २ जानेवारी,१९८५ व शासन र्णिय वेतन १३९०/प्र.क्र.२/९०/सेवा-८, दिनांक १० मे,१९९० मधील (ड) उपखंडात नमूद केल्याप्रमाणे, पद प्रथम रिक्त झालेल्या दिनांकापासून एक वर्षापर्यन्त अतिरिक्त वेतन/विशेष वेतन मंजूर करण्यास विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख सक्षम राहतील.

**दोन)** पद प्रथम रिक्त झालेल्या दिनांकापासून दोन वर्षापर्यन्त अतिरिक्त वेतन /विशेष वेतन मंजूर करण्यास प्रशासकीय विभाग सक्षम राहील.

**तीन)** दोन किंवा अधिक शासकीय कर्मचा-यांमध्ये कामाचे वाटप करणे शक्य असेल त्यावेळी कोणतेही विशेष वेतन किंवा अतिरिक्त वेतन मंजूर करु नये.

**चार )** दोन वर्षापुढे अतिरिक्त कार्यभार सुरु ठेवावयाचा असेल अशा प्रकरणी दोन वर्षाचा कालावधी संपण्यापूर्वी पुढील प्रकारची अपवादात्मक प्रकरणे सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभाग यांच्याकडे पुर्वानुमतीसाठी पाठविण्यात यावीत :-

अ) ज्या प्रकरणी वैध प्रशासकीय कारणास्तव अतिरिक्त कार्यभार दोन वर्षापुढे चालू ठेवणे आवश्यक असल्याचे प्रशासकीय विभागाने ठोस समर्थन केले आहे.

ब) महाराष्ट्र लोकसेवा आयोग अथवा तत्सम निवड मंडळामार्फत रिक्त पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती व्हावयाची आहे आणि मंत्रालयीन विभागाने (र) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे किंवा तत्सम निवड मंडळाकडे पद रिक्त होण्यापूर्वी सहा महिने आधीच मागणीपत्र पाठविले आहे. (ब) रिक्त पदांचे कामाचे वाटप करणे शक्य नाही आणि (ल) योग्य अर्हतेच्या व्यक्ती रिक्त पदांवर तातपुरत्या पदोन्नतीसाठी उपलब्ध नाहीत, असे प्रशासकीय विभागाने प्रमाणित करणे आवश्यक राहील.

क) न्यायालयीन प्रकरणामुळे पद  भरणे शक्य नाही.

वर नमूद केलेल्या कारणाव्यतिरिक्तची प्रकरणे सामान्य प्रशासन विभाग  आणि वित्त विभागाकडे पूर्वानुमतीसाठी पाठवू नयेत.

३. दोन वर्षाचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी जर सामान्य प्रशासन आणि वित्त विभाग यांची पूर्वानुमती घेतली नाही अशी रिक्त पदे आपोआप व्यपगत होतील. कार्योत्तर मंजूरीसाठीचे प्रस्ताव विचारात घेता येणार नाहीत. दोन वर्षापुढे अतिरिक्त कार्यभार सुरु ठेवुन विशेष वेतन मंजूर केले आहे असे आढळल्यास, संबंधित अधिका-यांवर जबाबदारी नियिचत करुन आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल. नवीननिर्माण झालेली पदे त्या दिनांकापासून जास्तीत जास्त-२ वर्षे पर्यंत अतिरिक्त कार्यभार देण्यासाठी ठेवण्यात येईल व त्यानतर ते पद आपोआप व्यपगत होईल.

४. यापूर्वी प्रलंबित असणारी प्रकरणे सामान्य  सामान्य प्रशासन विभाग, आणि वित्त विभाग यांच्या सहमतीने निकाली काढावीत.

५. प्रस्तुत आदेश १ मार्च, १९९४ पासून अंमलात येतील.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम,१९८१ च्या नियम ५६ व त्यामधील परिशिष्ट एक मधील अनुक्रमांक १४ मधील याबाबतच्या तरतुदी या शासन निर्णयाच्या तरतुदीपुरत्या सुधारणा आल्या आहेत असे मानण्यात यावे. या नियमात व परिशिष्टात यथावकाश सुधारणा करण्या येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल  याच्या आदेशानुसार व नावाने,

कांता वाघमारे,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापला (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र नागपूर.
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्याचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख, प्रादेशिक प्रमुख व कार्यालयीन प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट भारत सरकार, वित्त मंत्रालय,(व्यय विभाग), खोली क्र. २६१ नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई, उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-३.

* पत्राद्वारे.